महाराष्ट्र नागरी सेवा
(सुधारित वेतन) नियम, २००९
वेतननिश्चितीसंबंधी सूचना -

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
शासन परिपत्रक, क्रमांक वेपुर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९
दिनांक :- ५ मे, २०१०.

पहा:-
१) शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर १२०९/प्र.क्र.२७/सेवा-९, दि.२२ एप्रिल, २००९
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९ एप्रिल, २००९
३) शासन शुद्धीपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२२ मे, २००९
४) केंद्र शासन, वित्त मंत्रालय, व्यय विभाग यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.१/१/२००८-आय सी, दि.२९ जानेवारी, २००९

राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांना वरील क्र.१ येथील आदेशान्वये दि.१जानेवारी, २००६ पासून सुधारित वेतन संरचना लागू करण्यात आली आहे. सुधारित वेतन संरचनेत वेतननिश्चिती करण्यासाठी वेतननिश्चितीच्या नियमांच्या अनुषंगाने शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.वेपुर १२०९/ प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९ एप्रिल, २००९ अन्वये स्पष्टीकरणात्मक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

केंद्र शासनाने सुधारित वेतन संरचनेतील वेतननिश्चिती / वेतनवाढीसंदर्भात वरील क्र.४ येथील ज्ञापनान्वये स्पष्टीकरणात्मक आदेश निर्गमित केले आहेत. त्यामधील तसेच अन्य मुद्यांच्या अनुषंगाने वेतननिश्चिती / वेतनवाढीसंदर्भात पुढीलप्रमाणे खुलासा करण्यात येत आहे.

२.१ महाराष्ट्र नागरी सेवा ( वेतन) नियम, १९८१ च्या नियम ११(१) व ११(२) नुसार वेतननिश्चितीसंदर्भात :-

(अ) वरील नियम ११(१) मधील तरतूदी अंमलात असून त्यामध्ये महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ च्या नियम १३ च्या मर्यादेत सुधारणा झाली आहे. म्हणजेच पदोन्नतीनंतर अधिक महत्त्वाची कर्तव्ये किंवा जबाबदाऱ्या येत असतील तरच उक्त नियम १३ नुसार वेतननिश्चिती करुन वेतनवाढ विनियमित करण्यात यावी.

(ब) पदोन्नतीनंतर अधिक महत्त्वाची कर्तव्ये किंवा जबाबदाऱ्या येत नसतील तेव्हा तसेच अकार्यात्मक वेतनसंरचना (Non Functional Pay Structure) मंजूर केल्यानंतर पुढीलप्रमाणे वेतननिश्चिती करण्यात यावी.

(१) वेतनबँडमध्ये बदल होत नसल्यास, कर्मचाऱ्याच्या वेतनबँडमधील वेतनात बदल होणार नाही मात्र, त्याला यथास्थिती पदोन्नतीच्या पदाच्या वेतनसंरचनेतील / अकार्यात्मक वेतनसंरचनेतील ग्रेड वेतन मंजूर करण्यात यावे.

(२) वेतनबँडमध्ये बदल होत असेल आणि कर्मचाऱ्याचे जुन्या वेतनबँडमधील वेतन नवीन वेतनबँडमधील किमान वेतनापेक्षा अधिक असेल तर त्याच्या बेतनबँडमधील वेतनात बदल होणार नाही. कर्मचाऱ्याच्या जुन्या वेतनबँडमधील वेतन हे नवीन वेतनबँडमधील किमान वेतनापेक्षा कमी असेल तेव्हा त्यास नवीन वेतनबँडमधील किमान वेतन देय होईल. या दोन्ही प्रकरणी त्याला यथास्थिती पदोन्नतीच्या पदाच्या वेतन संरचनेतील / अकार्यात्मक वेतनसंरचनेतील ग्रेड वेतन मंजूर करण्यात यावे.

(३) वरील (१) व (२) येथील प्रकरणी म.ना.से.(वेतन)नियम, १९८१ च्या नियम ११(२) नुसार वेतननिश्चितीचा विकल्प देण्याची मुभा आहे.

(४) पदोन्नतीच्या / अकार्यात्मक वेतनसंरचना मंजूरीच्या दिनांकापासून वेतननिश्चितीचा विकल्प दिला असेल आणि असा वेतननिश्चितीचा दिनांक हा २ जुलै ते १ जानेवारी या कालावधीतील असेल तर वेतनवाढ पुढील १ जुलै रोजी अनुज्ञेय होईल. परंतु, वेतननिश्चितीचा दिनांक हा २ जानेवारी ते ३० जून या कालावधीतील असेल तर वेतनवाढ पुढील वर्षाच्या १ जुलै रोजी अनुज्ञेय होईल.

२.२ शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक वेपुर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९ एप्रिल, २००९ सोबतच्या जोडपत्र तीन मधील वेतननिश्चितीच्या शीघ्रगणकाच्या विवरणपत्रांमध्ये (Statements) पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

अ) पृ.क्र.३१ / विवरणपत्र क्र.१

| Existing Basic Pay | Revised Pay Structure | | | |
|---|---|---|---|---|
| | Pay in Pay Band | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1300 | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1400 | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1500 |
| 3,140 | 5,840 | 7,140 | 7,240 | 7,340 |

ब) पृ.क्र.३१ / विवरणपत्र क्र.२

| Existing Basic Pay | Revised Pay Structure | | | |
|---|---|---|---|---|
| | Pay in Pay Band | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1600 | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1700 | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1800 |
| 4,070 | 7,570 | 9,170 | 9,270 | 9,370 |
| 4,140 | 7,700 | 9,300 | 9,400 | 9,500 |

क) पृ.क्र.३२ / विवरणपत्र क्र.३

| Existing Basic Pay | Revised Pay Structure | | |
|---|---|---|---|
| | Pay in Pay Band | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1650 | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1750 |
| 4,070 | 7,570 | 9,220 | 9,320 |
| 4,140 | 7,700 | 9,350 | 9,450 |

२.३ शासन शुद्धिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक वेपुर-१२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२२मे, २००९ मधील अ.क्र. १ येथील नोंद रद्द करून शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक वेपुर

१२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९ एप्रिल, २००९ सोबतच्या जोडपत्र तीन मधील पृष्ठ क्र.३३ वरील वेतननिश्चितीच्या शीघ्रगणकाच्या विवरणपत्र ४ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| Existing Basic Pay | Revised Pay Structure | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | Pay in Pay Band | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1800 | Revised Basic Pay in Grade Pay Rs.1900 | Revised Basic Pay in Grade Pay Rs.2000 | Revised Basic Pay in Grade Pay Rs.2100 |
| 2,750 | 5,200 | 7,000 | 7,100 | 7,200 | 7,300 |

२.४ शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक वेपुर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९ एप्रिल, २००९ सोबतच्या जोडपत्र तीन मधील पृष्ठ क्र.४१ वरील वेतननिश्चितीच्या शीघ्रगणकाच्या विवरणपत्र १४ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| Existing Basic Pay | Revised Pay Structure | |
|---|---|---|
| | Pay in Pay Band | Revised Basic Pay in Grade Pay Rs.5000 |
| 9,250 | 17,210 | 22,210 |

**२.५ सुधारित वेतनसंरचनेत वेतनवाढीची परिगणना करताना रक्कम पुढील १०च्या पटीत घेण्यासंदर्भात -**

सुधारित वेतनसंरचनेत वेतनबँडमधील वेतन व ग्रेड वेतनावर ३% दराने वेतनवाढ देण्याची तरतूद वरील क्र.३ येथील शासन अधिसूचनेन्वये अधिसूचित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम ९ मध्ये आहे. सदर ३% रक्कम पुढील १०च्या पटीत घेण्यात येते.

वेतनवाढीची परिगणना करताना ३% रक्कम १०च्या पटीत घेताना एक रुपया व त्यापेक्षा अधिक रक्कम पुढील दहाच्या पटीत घेण्यात यावी; मात्र ९९ पैसे व त्यापेक्षा कमी पैसे दुर्लक्षित करण्यात यावेत.

उदा:- १) वेतनवाढीची रक्कम रू.६००.९० येत असल्यास ती रू.६०० इतकी घेण्यात यावी.
२) वेतनवाढीची रक्कम रू.१११०.७० येत असल्यास ती रू.१११०इतकी घेण्यात यावी.
३) वेतनवाढीची रक्कम रू.१४३१.१० येत असल्यास ती रू.१४४० इतकी घेण्यात यावी.
४) वेतनवाढीची रक्कम रू.१५०१ येत असल्यास ती रू.१५१० इतकी घेण्यात यावी.

२.६ शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक वेपुर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९ एप्रिल, २००९ मधील परिच्छेद ७.३ वगळण्यात येत आहे. म्हणजेच सुधारित वेतन संरचनेत वेतननिश्चिती करताना वेतन बँडमधील वेतन, वेतनबँडच्या कमाल टप्प्याच्या पुढील रकमेवर निश्चित होत असल्यास अशा कमाल टप्प्याच्या पुढील रकमेवरच वेतननिश्चिती करण्यात यावी. अशा प्रकरणी एक वर्षानंतर लगतचा उच्च वेतनबँड मंजूर करण्यात यावा. सदर वेतनबँड मंजूर करताना एक वेतनवाढ देण्यात यावी.

२.७ सुधारित वेतन संरचनेत वेतननिश्चिती करताना दि. १ जानेवारी, २००६ रोजी वेतनवाढ देण्यासंदर्भात:-

"जे कर्मचारी विद्यमान वेतनश्रेणीतील कमाल वेतन दि.१ जानेवारी, २००६ रोजी एक वर्ष किंवा त्याहून अधिक कालावधीपर्यंत घेत आहेत, त्यांच्याबाबतीत सुधारित वेतन संरचनेत

दि.१जानेवारी, २००६ रोजी पुढील वेतनवाढ देय होईल. त्यानंतर नियम १० मधील तरतुदी लागू राहतील" अशी तरतूद महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम १० मध्ये आहे.

वरील तरतुदीचा लाभ एक वा त्यापेक्षा अधिक कुंठीत वेतनवाढी मिळून दि.१जानेवारी, २००६ रोजी वेतनश्रेणीच्या कमाल वेतनाच्या पुढील एकाच वेतन टप्प्यावर एक वर्ष किंवा त्याहून अधिक कालावधीपर्यंत वेतन घेत असलेल्या कर्मचाऱ्यांनाही अनुज्ञेय राहील.

म्हणजेच दिनांक १ जानेवारी, २००५ नंतर कोणतीही कुंठीत वेतनवाढ मंजूर करण्यात आली असल्यास वरील तरतुदीचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

३. या आदेशांनुसार वेतननिश्चिती केल्यानंतर / वेतनवाढ परिगणित केल्यानंतर वरील क्र. (२) येथील परिपत्रकातील परिच्छेद १४ नुसार दि.१ जानेवारी, २००६ ते दि. ३१ मार्च, २००९ या कालावधीतील थकबाकीच्या हप्त्यांची पुन्हा परिगणना करण्यात यावी आणि अतिप्रदानाची/ देय थकबाकीची रक्कम भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्यात येणाऱ्या थकबाकीच्या पुढील हप्त्याशी समायोजित करण्यात यावी. सेवेत कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत दिनांक १ एप्रिल, २००९ पासून झालेले वेतनाचे अतिप्रदान कमाल पाच हप्त्यात मासिक वेतनातून वसूल करण्यात यावे.

दिनांक १ जानेवारी, २००६ ते या आदेशांच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत या आदेशांनुसार वेतननिश्चिती /वेतनवाढ विनियमित करुन निवृत्तिवेतन पुनर्निश्चित करण्यात यावे. वेतनाच्या थकबाकीच्या हप्त्यांची परिगणना वर नमूद परि. १४ नुसार आणि निवृत्तिवेतनाच्या थकबाकीच्या हप्त्यांची परिगणना त्यासंबंधीच्या आदेशांतील तरतुदींनुसार पुन्हा करण्यात यावी आणि वेतनाच्या अतिप्रदानाची / देय थकबाकीची रक्कम वेतनाच्या थकबाकीच्या पुढील हप्त्याशी समायोजित करण्यात यावी. तसेच निवृत्तिवेतनाच्या अतिप्रदानाची / देय थकबाकीची रक्कम निवृत्तिवेतनाच्या थकबाकीच्या पुढील हप्त्याशी समायोजित करण्यात यावी.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक वेपुर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९ एप्रिल, २००९ मधील तरतुदी या आदेशांतील सुधारणांच्या मर्यादेत सुधारित झाल्या असल्याचे समजण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०१००५०५१६२६०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शि. म. म्हात्रे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
मंत्रालयीन सर्व विभाग
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर.
कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख.
# प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
# प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
# प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
#आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व)
# सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
#प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
राज्य महिला आयोग, मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा
महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड. पुणे
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
सिनियर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका
कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/देवळाली/अहमदनगर
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती
कुलसचिव, श्रीमती नाथाबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि.रायगड
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई / पुणे/ नागपूर/ औरंगाबाद /नाशिक/ अमरावती.
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-९)